असा. क्र. ९१ रजिस्टर्ड नं. एमएच/एमआर/साऊथ-२२९/२००६-०८



# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

बुधवार, ऑगस्ट २२, २००७/श्रावण ३१, शके १९२९

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-अ

महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.

### रोजगार व स्वयंरोजगार विभाग

नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३१ जुलै २००७

### अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्र. इएसई. २००६/प्र. क्र. १६/प्रशा-२.—भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून आणि या संदर्भात सध्या अस्तित्वात असलेल्या सर्व नियम, आदेश किंवा अनुदेश यांचे अधिक्रमण करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या अधिपत्याखालील रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाच्या आस्थापनेवरील " उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार

गट-अ " आणि " सहाय्यक संचालक, रोजगार व स्वयंरोजगार गट-अ, " या पदांच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करण्यासाठी, याद्वारे, पुढील नियम करीत आहेत :—

१. या नियमांना रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाच्या आस्थापनेवरील उप संचालक आणि सहाय्यक संचालक, रोजगार व स्वयंरोजगार गट-अ (सेवाप्रवेश) नियम, २००७ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(अ) " आयोग " म्हणजे महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(ब) " पदवी " म्हणजे सांविधिक विद्यापीठाची पदवी.

(क) " विभाग " म्हणजे महाराष्ट्र शासनाचा रोजगार व स्वयंरोजगार विभाग.

(ड) " संचालनालय " म्हणजे रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय.

(ई) " शासन " म्हणजे महाराष्ट्र शासन.

३. संचालनालयातील उप संचालक, गट-अ या पदावरील नियुक्ती संचालनालयातील सहाय्यक संचालक, गट-अ हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर तीन वर्षापेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून गुणवत्ता-नि-ज्येष्ठता या निकषावर पात्र ठरलेल्या योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने करता येईल.

४. संचालनालयातील सहाय्यक संचालक, गट-अ, या पदावर नियुक्ती पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येईल,—

(अ) संचालनालयातील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब हे पद धारण करणाऱ्या व त्या पदावर तीन वर्षापेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता-नि-योग्यता या निकषावर पात्र ठरलेल्या योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने, किंवा

(ब) पुढीलप्रमाणे अर्हता/पात्रता धारण करणाऱ्या व्यक्तींमधून नामनिर्देशनाने :—

(एक) ज्यांचे वय ३३ वर्षापेक्षा अधिक नाही, परंतु, अगोदरच शासन सेवेत असलेल्यांसाठी वयोमर्यादा सात वर्षांनी शिथील करता येईल.

(दोन) एखाद्या सांविधिक विद्यापीठाची कोणत्याही विद्याशाखेची किमान दुसऱ्या श्रेणीची पदवी किंवा शासनाने तिच्याशी समतुल्य म्हणून जाहीर केलेली इतर कोणतीही अर्हता धारण करीत आहे.

(तीन) वरील पोट नियम (दोन) मध्ये नमूद अर्हता धारण केल्यानंतर प्रशासन, वाणिज्य, कामगार कल्याण किंवा कल्याणकारी काम किंवा शैक्षणिक किंवा व्यावसायिक मार्गदर्शन किंवा रोजगार पणन, संशोधन किंवा वाणिज्य क्षेत्रात सर्वेक्षण किंवा सांख्यिकी आकडेवारीचे संकलन व निर्वचन किंवा संगणकीय प्रक्रिया पद्धतीमधील विश्लेषण व प्रयुक्तता या पर्यवेक्षी क्षेत्रातील पदावरील तीन वर्षापेक्षा कमी नसेल इतका अनुभव धारण केलेला आहे.

परंतु, संगणक प्रयुक्तता या विषयाच्या जसे बी.ई.(संगणक), बी.एस.सी. (आय.टी.) एम.सी.ए. किंवा समकक्ष विषयातील पदवी धारण करणाऱ्या व्यक्तीस प्राधान्य देण्यात येईल.

परंतु, आणखी तरतूद करण्यात येते की, असामान्य अर्हता किंवा अनुभव किंवा दोन्ही असणाऱ्या व्यक्तीच्या बाबत आयोगाच्या शिफारशीवरून कमाल वयोमर्यादा तीन वर्षांपर्यंत शिथिल करता येईल.

५. नियम ४(ब) च्या पोटनियम (दोन) व (तीन) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती किंवा विमुक्त जाती किंवा भटक्या जमाती यांतील उमेदवारांसाठी राखीव असलेली पदे भरण्यासाठी आवश्यक अर्हता किंवा अनुभव असलेले उमेदवार पुरेशा संख्येत उपलब्ध नाहीत, असे आयोगाचे निवड करण्याच्या कोणत्याही टप्प्यावर मत झाल्यास, अशी निवड करण्याबाबतीत त्या नियमांमध्ये ठरवून दिलेली आवश्यक अर्हतेची श्रेणी किंवा अनुभवाचा कालावधी किंवा दोन्ही बाबी शिथिल करून अशा जातीच्या किंवा जमातीच्या योग्य उमेदवारांची निवड करता येईल. मात्र अनुभवाच्या कालावधी दोन वर्षांपर्यंतच शिथिल करता येईल.

६. नियम ४ मध्ये नमूद पदांवर पदोन्नती आणि नामनिर्देशन या मार्गाने करावयाच्या नेमणुका ५० : ५० या गुणोत्तरात करता येतील.

७. नियम ४ मध्ये नमूद पदावर नियुक्ती करण्यात आलेली व्यक्ती दोन वर्षांच्या कालावधीकरिता परिविक्षाधीन असेल. परिविक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त एक वर्षापर्यंत वाढविता येईल. जर उमेदवाराने परिविक्षाधीन कालावधी यशस्वीरीत्या पूर्ण केला नाही किंवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली नाही किंवा त्या पदासाठी अयोग्य असल्याचे आढळून आले तर पूर्व सूचनेशिवाय सेवा समाप्त करण्यात उमेदवार पात्र ठरेल.

८. नियम ४ मध्ये नमूद केलेल्या पदावर नेमणूक करण्यात आलेल्या व्यक्ती विभागीय हिंदी व मराठी परीक्षा आणि वेळोवेळी विहित करण्यात येईल अशी कोणतीही इतर परीक्षा, जर अगोदरच उत्तीर्ण झालेली नसेल किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल, तर त्या परीक्षा, त्याबाबत करण्यात आलेल्या नियमानुसार उत्तीर्ण होणे आवश्यक असेल.

९. नियम ३ व ४ मध्ये नमूद केलेल्या पदावर नेमणूक करण्यात आलेल्या व्यक्तीस महाराष्ट्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेल्या संगणक अर्हतेबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील.

१०. नियम ३ आणि ४ मध्ये नमूद केलेल्या पदावर नेमणूक करण्यात आलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोठेही बदली होण्यास पात्र असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

गोरख मेघ,
शासनाचे प्रधान सचिव.

## EMPLOYMENT AND SELF EMPLOYMENT DEPARTMENT

New Administrative Building, 14th Floor,
Mantralaya, Mumbai 400 032, dated 31st July 2007.

### *NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. ESE. 2006/C.R.-96/ADM-2.—In exercise of the powers conferred by the proviso to Article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made in this behalf, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating the recruitment to the post of Deputy Director and the Assistant Director, Employment and Self Employment, Group-A on the establishment of the Directorate of Employment and Self Employment under the Employment and Self Employment Department of Government of Maharashtra, namely :—

1. These rules may be called the Deputy Director and the Assistant Director, Employment and Self Employment Group-A, on the establishment of the Directorate of Employment and Self Employment (Recruitment) Rules, 2007.

2. In these rules unless the context requires otherwise,—

(*a*) "Commission" means the Maharashtra Public Service Commission.

(*b*) "Degree" means a degree of a statutory University,

(*c*) "Department" means Employment and Self Employment Department of the Government,

(*d*) "Directorate" means Directorate of Employment and Self Employment,

(*e*) "Government" means the Government of Maharashtra.

3. Appointment to the post of Deputy Director, Group-A, in the Directorate shall be made by promotion of a suitable person on the basis of merit *cum* seniority from amongst the persons holding the post of Assistant Director, Group-A, in the Directorate, having not less than three years regular service in the cadre.

4. The appointment to the post of Assistant Director, Group-A, in the Directorate, shall be made either,—

(*a*) by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst persons holding the post of Employment and Self Employment Guidance Officer, Group-B, in the Directorate having not less than 3 years regular service in that cadre or

(*b*) by nomination from amongst the persons who,—

(*i*) are not more that 33 years of age, provided that, the age limit may be relaxed by 7 years in case of the candidates who are already in the Government Service,

(*ii*) possess a degree of statutory University of any faculty at least in second class or any other qualification declared by Government to be equivalent thereto,

(*iii*) possess three years experience in a supervisory capacity in Administration, Commerce, Labour, Welfare or Welfare Work and Educational or Vocational Guidance, or Employment Market Research or Economic Field Survey, or Compilation and Interpretation of Statistical Data or Computer Programming System analysis and application, gained after acquiring the qualification mentioned in clause (*ii*) above :

Provided that, preference may be given to candidate holding a degree in Computer Application such as Bachelor of Engineering (Computer), Bachelor of Science (Information Technology), Master of Computer Application, or it's equivalent thereto :

Provided further that, the upper age limit may be relaxed by three years on the recommendation of the Commission in favour of persons having exceptional qualification or experience or both.

5. Notwithstanding anything contained in sub-clauses (ii) and (iii) of sub rule (b) of rule 4, if at any stage of selection, the Commission is of the opinion that sufficient number of candidates possessing the requisite qualifications or experience are not available to fill the vacancies reserved for candidates belonging to the Scheduled Castes, Scheduled Tribes or

Denotified Tribes, or Nomadic Tribes, then the Commission may in the matter of such selection, relax the requirements in respect or the requisite class or the period of experience or both set out therein and select suitable candidates belonging to such Castes or Tribes. However, the period of experience shall be relaxed upto two years only.

6. Appointment to the posts mentioned in rules 4 by promotion and by nomination shall be made in the ratio of 50 :50.

7. A person appointed to the post mentioned in rule-4 shall be on probation for a period of two years. Probation period may be extended by one year only. If the candidate fails to complete probation period successfully or does not pass departmental examination, or is found to be unsuitable for the post, the candidate will be liable for termination from service without prior notice.

8. A person appointed to the post mentioned in rule 4, shall be required to pass the Departmental Examination and Examination in Hindi and Marathi and any other examination that may be prescribed from time to time, in accordance with the rules made in that behalf, unless the candidate has already passed or has been exempted from passing those examinations.

9. A person appointed in the post mentioned in rules 3 and 4 should possess a certifacate in Computer Operation prescribed by the Directorate of Information and Technology, Government of Maharashtra, from time to time.

10. A person appointed to the posts mentioned in rules 3 and 4 above shall be liable for transfer anywhere in the State of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

GOREKH MEGH,
Principal Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई